कुकडेश्वर आदिवासी हिरडा औद्योगिक उत्पादक सहकारी संस्था मर्या. जुन्नर, जि. पुणे या संस्थेला राष्ट्रीय सहकारी विकास निगम योजनेतंर्गत शासकीय भाग-भांडवलाचा पहिला हप्ता मंजूर करणेबाबत (कोल्हे कमिटी)

**महाराष्ट्र शासन**

**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः प्रक्रिया-१११०/प्र.क्र.९८/९-स,**

**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,**

मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.

तारीखः- २० मार्च, २०१५

वाचा

१) शासन निर्णय क्रमांकः प्रक्रिया-११२००४/प.क्र.१६२(अ)/९-स, दि.१२.१०.२००७.

२) पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र दि.२५.७.२०१३.

३) मुख्य व्यवस्थापक, राष्ट्रीय कृषी व ग्रामीण विकास बँक(नाबार्ड), मुंबई यांचे दि.१०.९.२०१२ चे पत्र.

४) शासन निर्णय समक्रमांक दिनांक ९.४. २०१३

५) शासन निर्णय समक्रमांक दिनांक १५.१.२०१४

६) वित्त विभाग शासन परिपत्रक क्र.अंदाज२०१४/प्र.क्र.११०/अर्थ-३ दि.१.७.२०१४.

७) शासन निर्णय समक्रमांक दिनांक २२.८.२०१४

८) वित्त विभाग शासन परिपत्रक क्र.अंदाज२०१३/प्र.क्र.८५/अर्थ-३ दि.९.२.२०१५.

प्रस्ताविकाः-

**श्री. कुकडेश्वर आदिवासी हिरडा औद्योगिक उत्पादक सहकारी संस्था मर्या. जुन्नर, जि. पुणे या** संस्थेमार्फत उभारण्यात येत असलेल्या रु.३३६.३५ लाख किंमतीच्या **"हिरडा प्रक्रिया"** प्रकल्पास समक्रमांकाच्या संदर्भीय क्रमांक ४ येथील दिनांक ९.०४.२०१३ च्या शासन निर्णयान्वये कृषि प्रक्रिया सहकारी संस्थांना ४:३६:६० या प्रमाणात अर्थसहाय्य या योजनेअंतर्गत खालील आकृतीबंधानुसार प्रशासकीय मंजूरी देण्यात आलेली आहे.

(रुपये लाखात)

| अ. क्र. | तपशील | टक्केवारी(प्रकल्प किंमतीच्या | ४:३६:६० या प्रमाणात शासनाने मंजूर केलेला आर्थिक आकृतीबंध(कमाल रु.३३६.३५) |
|---|---|---|---|
| १ | रा.स.वि.नि. किंवा इतर वित्तीय संस्थांकडून कर्ज | ६०% | २०१.०९ |
| २ | राज्य शासनाचे भाग-भांडवल | ३६% | १२१.०९ |
| | एकूण {१+२} :- | ९६% | ३२२.८९ |
| ३ | संस्थेचे स्व भाग-भांडवल | ०४% | १३.४६ |
| | एकूण :- | १००% | ३३६.३५ |

२. सदर संस्था ही उर्वरित महाराष्ट्रातील आहे. सन २०१४-१५ या आर्थिक वर्षामध्ये कृषि प्रक्रिया करीता संबंधित ३ लेखाशिर्षांखाली प्रत्येकी १००.०० लक्ष प्रमाणे एकूण रु.३००.०० लक्ष इतकी अर्थसंकल्पिय तरतूद करण्यात आलेली असून मा. राज्यपाल महोदय यांच्या निदेशाचे अनुषंगाने प्रादेशिकमंडळ निहाय वाटपानुसार विदर्भासाठी २३.०३%, मराठवाडयासाठी १८.७५% आणि उर्वरित महाराष्ट्रासाठी ५८.२२% इतकी तरतूद उपलब्ध आहे. उर्वरित महाराष्ट्रासाठी उपलब्ध हिश्यानुसार संबंधित संस्थेस सन २०१४-१५ या आर्थिक वर्षात पहिल्या हप्त्याची रु.५८,२२,०००/- इतकी रक्कम देय होती. तथापि, संबंधित संस्थेस रक्कम वितरित करताना वित्त विभागाच्या दि.०१.०७.२०१४ च्या परिपत्रकामध्ये केवळ ६०% रक्कम खर्चास मान्यता दिली असल्याने श्री. कुकडेश्वर आदिवासी हिरडा औद्योगिक उत्पादक सहकारी संस्थेस रु.३४.९३ लक्ष रक्कम संदर्भीय समक्रमांकाच्या दिनांक २२.८.२०१४ च्या शासन निर्णयान्वये वितरित करण्यात आली.

३. आता वित्त विभागाने संदर्भीय दिनांक ९.२.२०१५ च्या परिपत्रकान्वये योजनांतर्गत योजनांसाठी ७५% एवढया मर्यादेत निधी वितरित करण्यास दर्शविलेल्या सहमतीस अनुसरून श्री कुकडेश्वर आदिवासी हिरडा औद्योगिक उत्पादक सहकारी संस्थेस पहिल्या हप्त्यात देय आलेल्या रु.५८.२२ लक्ष रक्कमेतील उर्वरित १५% म्हणजे रु.८.७३ लक्ष रक्कम वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत शासन खालीलप्रमाणे आदेश देत आहे :-

शासन निर्णय

**श्री. कुकडेश्वर आदिवासी हिरडा औद्योगिक उत्पादक सहकारी संस्था मर्या. जुन्नर, जि. पुणे** या संस्थेला कृषि प्रक्रिया सहकारी संस्थांना अर्थसहाय्य योजनेअंतर्गत मंजूर वित्तीय आकृतीबंधानुसार **अनुज्ञेय असलेल्या शासकीय भाग-भांडवलाच्या रु.१२१.०९ लक्ष रक्कमेपैकी** पहिल्या हप्त्यात देय असलेल्या आणि उर्वरित महाराष्ट्राच्या हिश्श्याच्या रु.५८.२२ लक्ष रक्कमेपैकी संदर्भीय दिनांक २२.८.२०१४ च्या शासन निर्णयान्वये वित्त विभागाच्या संदर्भीय दिनांक १.७.२०१४ च्या परिपत्रकातील सूचनांनुसार **रु.३४,९३,०००/- इतकी** ६०% **रक्कम** वितरीत करण्यात आलेली आहे. वित्त विभागाने संदर्भीय दिनांक ९.२.२०१५ च्या परिपत्रकान्वये योजनांतर्गत योजनांसाठी ७५% एवढया मर्यादेत निधी वितरित करण्याबाबत दिलेल्या निदेशांस अनुसरून या शासन निर्णयान्वये **श्री. कुकडेश्वर आदिवासी हिरडा औद्योगिक उत्पादक सहकारी संस्था मर्या. जुन्नर, जि. पुणे या संस्थेस उर्वरित १५% म्हणजे रु.८,७३,०००/- लक्ष रक्कम मंजूरी देण्यात येत आहे.** शासकीय भाग-भांडवलाच्या परतफेडीच्या अटी व शर्ती संदर्भीय क्रमांक १ येथील दिनांक १२.१०.२००७ च्या शासन निर्णयातील (प्रत संलग्न) तरतूदींनुसार राहतील.

२. या शासन निर्णयाद्वारे मंजूर करण्यात आलेल्या **रु.८,७३,०००/- इतकी रक्कम (अक्षरी रुपये आठ लाख त्र्यहात्तर हजार फक्त)** या रकमेचा धनादेश

**"श्री.कुकडेश्वर आदिवासी हिरडा औद्योगिक उत्पादक सहकारी संस्था मर्यादित, जुन्नर, ता. जुन्नर, जि. पुणे"**

**"SHRI KUKADESHWAR ADHIVASI HIRDA AUDHYOGIK SAHAKARI SANSTHA MARY., JUNNER TAL. JUNNER, DIST. PUNE. "**

या नांवाने काढण्यात यावा व सदर धनादेश संस्थेस वितरित करण्यात यावा.

३. वरीलप्रमाणे मंजूर केलेला शासकीय भाग-भांडवलाचा रु.८,७३,०००/- इतकी रक्कम (अक्षरी रुपये आठ लाख त्र्यहात्तर हजार फक्त) चा खर्च "मागणी क्र.व्ही-३, ४४२५-सहकारावरील भांडवली खर्च, (००) (१०८) इतर सहकारी संस्थांमधील गुंतवणूका (०२) सहकारी संस्करण संस्था - पंचवार्षिक योजनांतर्गत योजना- राज्य योजनांतर्गंत योजना (०२) (०८) कृषि प्रक्रिया संस्थांना भाग भांडवली

अंशदान (कोल्हे समिती) (राज्य योजना) (४४२५ ०७५९) ३२, अंशदाने" या लेखाशिर्षाखाली सन २०१४-१५ च्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

४. याव्यतिरिक्त **श्री. कुकडेश्वर आदिवासी हिरडा औद्योगिक उत्पादक सहकारी संस्था मर्या. जुन्नर, जि. पुणे** या संस्थेस शासकीय भाग-भांडवलाच्या परतफेडीसाठी नेहमीच्या अटी व शर्ती (त्यात काही सुधारणा /बदल असल्यास त्यासह) बंधनकारक राहतील. त्याचप्रमाणे दिनांक ९.४.२०१३ आणि दिनांक २२.८.२०१४ च्या शासन निर्णयातील सर्व अटींचे व सूचनांचे पालन करणे संस्थेवर तसेच, संबंधित क्षेत्रिय कार्यालयांवर बंधनकारक राहील.

५. हे आदेश नियोजन तसेच वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ **क्रमांक ३६३/१४/व्यय-२, दिनांक ७.८.२०१४** अन्वये प्राप्त मान्यतेनुसार आणि संदर्भीय दिनांक ९.२.२०१५ च्या शासन परिपत्रातील सूचनांनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३२०१५५४०२२३०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Balasaheb Ishwar Sawant

Digitally signed by Balasaheb Ishwar Sawant
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Desk Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Balasaheb Ishwar Sawant
Date: 2015.03.20 16:04:15 +05'30'

**बा.ई.सावंत**

कार्यासन अधिकारी महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. राज्यपाल महोदय यांचे प्रधान सचिव

२. मा.मुख्यमंत्री यांचे अप्पर मुख्य सचिव सचिव

३. मा.मंत्री ( सर्व ) यांचे खाजगी सचिव

४. मा.राज्यमंत्री ( सर्व ) यांचे खाजगी सचिव

५. सर्व मा.विधीमंडळ सदस्य,

६. महालेखापाल-१ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई.

७. महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई.

८. महालेखापाल-२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, नागपूर

९. महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर

१०. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई

११. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई

१२. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे

१३. व्यवस्थापकीय संचालक, राष्ट्रीय सहकारी विकास निगम, ४, सिरी इन्स्टीटयूशनल एरिया, हौज खास, नवी दिल्ली- ११० ०१६.

१४. प्रादेशिक संचालक, राष्ट्रीय सहकारी विकास निगम, ५, बी.जे. रोड, पुणे-१

१५. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे

१६. पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे

१७. कक्ष अधिकारी, नियोजन विभाग (का.१४३१) मंत्रालय, मुंबई

१८. कक्ष अधिकारी, वित्त विभाग (व्यय-२)/(अर्थसंकल्प-१३), मंत्रालय, मुंबई

१९. जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था, अकोला

२०. लेखाधिकारी, पणन संचालनालय, म. रा. पुणे-१

२१. कार्यासन अधिकारी (१७-स), सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

**२२.** अवर सचिव (२१-स), सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

२३. अध्यक्ष, श्री. कुकडेश्वर आदिवासी हिरडा औद्योगिक उत्पादक सहकारी संस्था मर्या. जुन्नर, जि. पुणे

२४. निवड नस्ती (९स).